राज्य शासनाच्या विविध विभागांची अधिकृत माहिती तसेच अधिकृत खुलासे प्रसारमाध्यमांना देण्याकरिता शासनातर्फे प्रवक्ता नेमण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्र.मावज-२०१६/प्र.क्र. १७४/का-३४-अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १६ नोव्हेंबर, २०१६

संदर्भ : १. शासन निर्णय क्र. माजम -१००५/९०५/प्र.क्र.७८/२००५/३४-अ, दि. २२/९/२००५
२. मुख्य सचिवाचे क्र.सीएसओ-२०१६/१८४३६२९/डी-१, दि. १७.९.२०१६ चे पत्र.

## शासन परिपत्रक

राज्य शासनाचे विविध विभाग, त्यांच्या लोकाभिमुख योजना किंवा महत्त्वपूर्ण घटना-घडामोडींच्या वेळी शासनाची अधिकृतपणे बाजू मांडली न गेल्याने अपुऱ्या माहितीच्या आधारे चूकीचे वृत्तांकन होते. तसेच राज्य शासनाच्या विविध विभांगाची अधिकृत माहिती प्रसारमाध्यमांना वेळेत देणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्य शासनाच्या विविध विभागांची अधिकृत माहिती तसेच अधिकृत खुलासे प्रसारमाध्यमांना देण्याकरिता खालील दोन अधिकाऱ्यांना शासनातर्फे **'शासकीय प्रवक्ता '** म्हणून घोषित करण्यात आले आहे.

१. सचिव (माहिती व जनसंपर्क), मंत्रालय, मुंबई
२. महासंचालक (माहिती व जनसंपर्क), मंत्रालय, मुंबई

२. शासकीय प्रवक्त्यांतर्फे आवश्यकतेप्रमाणे वर्तमानपत्रे, दूरदर्शनवाहिन्या व इतर प्रसार माध्यमांना अधिकृत शासकीय निर्णय, खुलासे आणि इतर अधिकृत शासकीय माहिती पुरविण्यात येते. सर्व शासकीय विभागानी संबंधीत प्रवक्त्यांना जी माहिती लागेल ती तातडीने पुरविण्याची व्यवस्था करावी. कोणत्याही विभागास आपली माहिती, निर्णय अथवा खुलासे प्रसारमाध्यमांना द्यावयाचे असतील तर ते शासकीय प्रवक्त्यांना उपलब्ध करुन द्यावेत. शासकीय प्रवक्त्यांने या सर्व बाबी परिणामकारकरित्या प्रसार माध्यमांपर्यंत पोहचतील याची खात्री करावी.

३. वर्तमानपत्रे, दूरदर्शनवाहिन्या व इतर प्रसार माध्यमाकडून चूकीच्या माहितीच्या आधारे किंवा वस्तुस्थितीचा चूकीचाअर्थ लावणारी टिका करण्यात आली असल्यास त्या संदर्भातील खुलासा त्याच दिवशी करणे अपेक्षित आहे. विभागांनी परस्पर खुलासा केल्यास त्याची प्रत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयास उपलब्ध करुन द्यावी. तसेच शासकीय प्रवक्त्याने मागणी केलेली माहिती / खुलासा संबंधीत विभागांने त्यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१६१११६१७४२३३४६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2016.11.16 17:46:24 +05'30'

**( रा. ना. मुसळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती ,**

१. राज्यपालांचे सचिव ,
२. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव ,
३. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मुख्य सचिव,
५. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
६. सचिव (माहिती व जनसंपर्क), सामान्य प्रशासन विभाग,
७. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
८. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
१०. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त, मुंबई,
११. सचिव, महराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१२. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
१३. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,,
१४. सर्व विभागीय आयुक्त,
१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१६. सर्व जिल्हाधिकारी/ जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७. संचालक (माहिती ) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१८. सर्व मंत्रालयीन विभाग,
१९. मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग/ कार्यालय प्रमुख,
२०. आयुक्त,सर्व महानगरपालिका,
२१. निवड नस्ती. (दोन प्रती)